अधिदान व लेखाकार्यालयातून रोख देय

"क" वर्ग नगरपालिकांच्या (२०,००० पेक्षा जास्त लोकसंख्या) पाणीपुरवठा योजनांसाठी आयुर्विमा महमंडळाकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी अनुदान.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलआयसी-२०१९/प्र.क्र.८९/पापु-०४**
७ वा मजला, जी.टी. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक रोड, मंत्रालय, मुंबई-४००००१
तारीख: ०३ फेब्रुवारी, २०२०

**वाचा**

१) शासन परिपत्रक, नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. एमडब्ल्यूएस-१७६५/१०१००३/एम, दि. ०८ जून, १९६८.
२) शासन निर्णय, नगर विकास व सार्वजनिक अरोग्य विभाग क्र. लोन-१०७५/यूडी- २२, दि. २० ऑगस्ट, १९७६.
३) शासन निर्णय, नगर विकास व सार्वजनिक अरोग्य विभाग क्र. एमडब्ल्यूएस-१०७६/२९२/यूडी-२२, दि. ११ फेब्रुवारी, १९७७.
४) शासन निर्णय, नगर विकास व सार्वजनिक अरोग्य विभाग क्र. डब्ल्यूएसबी-१०७६/३१०८/यूडी-२२, दि. ७ मार्च, १९७७
५) शासन निर्णय, नगर विकास व सार्वजनिक अरोग्य विभाग क्र. लोन-१०७६/२९७५ यूडी-२२, दि. १९ सप्टेंबर, १९७८.
६) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांक मजीप्रा/वित्त-१/शासन कर्ज/२०१९/ दि. १३.०५.२०१९,मजीप्रा/वित्त-१/आयुकर्ज/२५५/२०१९/दि.२४.१०.२०१९, मजीप्रा/वित्त-१/आयुर्विमा कर्ज/३२३/२०२०/दि. १०.०१.२०२०.
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: एलआयसी- २०१९/प्र.क्र.८९/ पापु-०४, दि. २४ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ज्या "क" वर्ग नगरपालिकांची लोकसंख्या २०,००० पेक्षा जास्त आहे, अशा नगरपालिकांच्या पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी आयुर्विमा महामंडळाकडून जून १९६८ नंतर घेतलेल्या कर्जाची परतफेड पहिली ५ वर्ष शासन करेल व त्यानंतर उर्वरित कालावधीकरीता कर्जाची परतफेड नगरपालिका व शासन ५०:५० या प्रमाणात करतील. यामधील शासनाने आयुर्विमा महामंडळास परतफेड केलेली कर्ज व व्याजाची रक्कम शासनाने नगरपालिकांना

दिलेले कर्ज आहे. परंतु सन १९७७ मध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची (पुर्वीचे महाराष्ट्र पाणीपुरवठा व जलनि:सारण मंडळ ) निर्मिती झाल्यानंतर आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणावर टाकण्यात आल्यामुळे कर्जाचे हप्ते फेडण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान दिले जाते. संदर्भाधीन दि. ७ मार्च, १९७७ च्या शासन निर्णयान्वये आखून देण्यात आलेल्या पध्दतीनुसार प्रत्येक वर्षी १ जून व १ डिसेंबर रोजी आयुर्विमा महामंडळास देय झालेल्या रकमांचे हप्ते महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अदा करते. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला मंजुर केलेले अनुदान कर्ज म्हणून समजण्यात येते. संदर्भाधीन दि. ८ जून १९६८ च्या शासन निर्णयानुसार आयुर्विमा महामंडळाकडून नगरपालिकांनी ज्या अटी व शर्तीनुसार कर्ज घेतले होते त्याच अटी व शर्तीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पुढील २० वर्षात नगरपालिकेकडून कर्जाची वसूली करते.

तथापि, नगरपालिकांकडून (भारतीय आयुर्विमा महामंडळ व शासनाकडून नगरपालिकांनी घेतलेल्या कर्जाची) कर्जाची परतफेड पुर्णांशाने होत नसल्याने व भारतीय आयुर्विमा महामंडळास परतफेड करण्यात येणारी रक्कम प्रथमत: दंडणीय व्याजापोटी समायोजित करण्यात येत असल्याने भारतीय आयुर्विमा महामंडळास कर्जाची परतफेड करण्यात येत नव्हती. तथापि, भारतीय आयुर्विमा महामंडळास देय शासनाचे दायित्व कमी होण्याच्या दृष्टीने उपलब्ध तरतूद वितरीत करण्याची व पर्यायाने भारतीय आयुर्विमा महामंडळ देय रक्कम भरण्यासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये प्रस्तावनेत नमुद केलेल्या आकृतीबंधाच्या अधिन राहून भारतीय आयुर्विमा महामंडळास कर्ज परतफेडीपोटी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०६.२०१९ रोजी देय मुद्दल रुपये २,२८,९५,४२५/- व व्याज रुपये ६४,००,१३६/- असे एकूण रुपये २,९२,९५,९८०/- व दिनांक ०१.१२.२०१९ रोजी देय मुद्दल निरंक व व्याज रुपये ४९,३४,५९३/- असे एकूण ३,४२,३०,५७३/- रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

०२. सदरील देय रक्कमेपैकी उपलब्ध तरतूद रु. २,०३,६४,६००/- एवढा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास दिनांक २४ जानेवारी २०२० च्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात आला आहे. तथापि, वित्त विभागाच्या दिनांक २२ जानेवारी २०२० रोजीच्या शासन निर्णयातील निर्देशांनुसार, लेखाशिर्ष ६२१५ ००९४ अंतर्गत **रूपये ६७,८८,२००/- (रुपये सदुसष्ट लाख अठ्ठयाऐंशी हजार दोनशे फक्त)** इतका निधी उपलब्ध झाला असल्याने सदर निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करण्यात येत आहे.

०३. सदर खर्च मागणी क्र. वाय-६, “६२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता यासाठी कर्जे, ०१- पाणी पुरवठा, १९०- स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना कर्जे-(०१) स्थानिक संस्था, नगरपालिका,

इत्यादींना कर्जे-(०१) (०१) पाणीपुरवठा योजनांसाठी आयुर्विमा महामंडळाकडून उभारलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी नगरपालिकांना कर्जे-(६२१५ ००९४) ५५, कर्जे व आगाऊ रकमा” या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. या लेखाशिर्षांतर्ग वेळोवेळी मंजुर केलेल्या कर्जाची जी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सन २०१९-२० मध्ये शासन लेख्याप्रमाणे संबंधित नगरपालिकांकडून वसूल केलेली रक्कम भरणे अपेक्षित होते. परंतु सदर वसुली होत नसल्याने सदर वसुलीबाबतचा शासन लेखा खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | वसुलीची रक्कम |
|---|---|---|
| १ | ६२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता यासाठी कर्जे ०१ पाणीपुरवठा १९०, सार्वजनिक क्षेत्र व उपक्रमांसाठी कर्जे (१) नागरी पाणीपुरवठा योजनेसाठी कर्जे (६२१५ ५०२२/००) | ०.०० |
| २ | ००४९ व्याजाच्या जमा रकमा १९१ स्थानिक संस्थांकडून मिळालेले व्याज (००४९ ००४३/००) | ०.०० |
| | **एकुण** | **०.००** |

०५. भारतीय आयुर्विमा महामंडळास नगरपालिकांच्या वतीने अदा करावयाची रक्कम काही वर्षे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास उपलब्ध करुन दिलेली नाही. तसेच नगरपालिकांकडून शासनाच्या कर्जाची परतफेड पुर्णांशाने होत नसल्याने व शासन कर्जापोटी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून देय रकमेचा भरणा शासनास होत नाही यास्तव शासन जमा करण्यात येणारी रक्कम निंरक असल्याने सदरील रकमांचे समायोजन शासकीय लेख्यात करता येत नाही. यास्तव, उपरोक्त मंजुर रक्कम रू. ६७,८८,२००/- (रुपये सदुसष्ट लाख अठ्ठयाऐंशी हजार दोनशे फक्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात यावी.

०६. उक्त मंजूर रक्कम प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक (वित्त) श्री. यशवंत पाटील यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व सह सचिव श्री. म. बा. हजारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यास सादर करावे. ही मंजूर रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास भरणा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील. सदर रक्कम इसीएस / आर.टी.जी.एस. प्रणालीद्वारे भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या खाती जमा करण्यात यावी.

०७. या निर्णयान्वये मुक्त केलेल्या अनुदानाच्या संदर्भात खालील बाबींची पुर्तता करावी.
अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वरील मंजूर रक्कमेच्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.
ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वरील मंजूर रक्कम ज्यासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच विनिर्दिष्ट प्रयोजनासाठी खर्च करावी.
क) वरील "अ" व "ब" मधील शर्तीची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पुर्तता होत आहे याची शासनाला खात्री करून घेता यावी म्हणून महालेखापाल १/२, मुंबई / नागपुर यांना लेखापरिक्षणाकरीता नोंद वहया व लेखे तपासनिचा अधिकार राहील आणि महालेखापालांना त्यांचे काम योग्य रीतीने पार पाडता यावे म्हणून प्राधिकरणाने संपूर्ण मदत व सुविधा पुरवावी.
ड) मुंबई वित्तीय नियम, १९५९ जोडपत्र-२२ मधील नियम क्रमांक २ अनुसार महालेखपाल यांनी मागणी केल्यास त्यांच्या तपासणी करिता या खर्चासंबंधी सर्व कागदपत्रे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने उपलब्ध करुन द्यावीत.

०८. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दिनांक ०८ जुलै, २०१९ अनुसार विहित अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याने त्यानुसार विहित प्राधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०३१२५४३२११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: CN = Ganesh Nivrutti Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2020.02.03 16:10:30 +05'30'

**(गणेश पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टावर्स, ४ था मजला, मुंबई-४०००२१.
२. मुख्याधिकारी, नगरपरिषदा व नगरपंचायती ( सर्व ).
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
४. अधिक्षक अभियंता, (सीपीडीएम ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , सिडको भवन, नवी मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर ( लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).

६. निवासी लेखाधिकारी, मुंबई -४०००२१.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
९. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती / नागपूर.
१०.वित्त विभाग, ( व्यय -३/ अर्थोपाय )मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-२०.
१२.निवडनस्ती ( का.क्र. पापु-०४ ),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.